महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील सहायक गट विकास अधिकारी यांच्या तदर्थ पदोन्नतीच्या पदस्थापनेत बदल करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२४/प्र.क्र.४७/आस्था-३ अ
३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: १५ मार्च, २०२४

**वाचा :**

**ग्राम विकास विभाग, शासन आदेश समक्रमांकः** दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४

**शासन आदेश :**

उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील ग्राम विकास विभागाच्या दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या आदेशान्वये, श्री.एन. बी. फुलझेले यांना सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चिमूर, जिल्हा चंद्रपूर या पदावर सरळसेवा कोट्यातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती.

०२. सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार, उक्त अधिनियमाच्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदी, नागरी सेवा मंडळाची शिफारस, बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने व श्री.फुलझेले यांनी केलेल्या विनंतीस अनुसरून, सदर आदेशातील नागपूर विभागातील श्री.एन. बी. फुलझेले यांच्या पदोन्नतीच्या पदस्थापनेत बदल करून त्यांना खालीलप्रमाणे स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी सुधारित पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या आदेशान्वये तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने सुधारित पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.एन. बी. फुलझेले, सहायक गट विकास अधिकारी | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पंचायत समिती, चिमूर, जिल्हा चंद्रपूर | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, बल्लारपूर, जिल्हा चंद्रपूर | रिक्त पदी |

**०२.** सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून संबंधित अधिकारी यांनी सुधारित पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये.

**०३.** मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करून श्री.एन. बी. फुलझेले यांना सुधारित पदस्थापनेच्या पदावर रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

**०४.** उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील ग्राम विकास विभागाच्या दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन आदेशात नमुद केल्याप्रमाणेच श्री.एन. बी. फुलझेले यांच्या तदर्थ पदोन्नतीबाबत इतर अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२०३७३०४८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.03.15 21:37:14 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा चंद्रपूर.
९. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).
१०. अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.